# हुसैन (रह.)की मजार डोळा पाहू...

अहो इथे अडीचशे किमी अंतरावर पाक पट्टनच्या बाबा फरीद (रह.) मजारला जायला जमेना आता करबल्याला कुठे जाताय?

मियां बिबीतील संभाषणाने नकारसूर लावला.

"आमा मियां, जायचं कोण म्हणतं फक्त तिथं जाणाऱ्या भाविकांच्या गमती, कष्ट, धावाधाव, परदेशचा परवाना कटकट, पैशाचा चुराडा वगैरे वाचलं

ते सांगू म्हणून म्हटलं. तेरी अजमेर शरीफ़ दर्ग्याची ख्वाहिश पूरी करेंगे.

इंडिया में च जाएंगे! त्वानू की फर्क पैंदा है?" लाहौरच्या हवेलीत बातें हो रही थी!

## चला चला करबल्याला जाऊ ... हुसैन (रह.)की मजार डोळा पाहू...

आपण मग मी ५५हजार पैसे भरून तारीख़ तय झाली.

लाहौरच्या लग्झरी एसी बसने आधी क्वेटाला जाताना रावी, सिंध दरिया ओलांडून मुल्तान, डेरा गाजीखान करत जावे लागते.




तिथे बस अड्ड्यावर शेकडो बसेस आलेल्या असतात. तिथे १०० चा एक तांडा,असे तांडे केले जातात. पुढे मागे पाकिस्तानी रेंजर्सची सिक्युरिटी असते. तिथून वैराण कबिलेवाल्यांचा भाग चालू होतो. ते हवेत फायरिंग करताना पाहून 'आनंद' व्यक्त केला जात आहे असे मानून गपचुप पुढे जावे लागते.




मग येते ताफतान शहर. तिथे इराणच्या वेशीबाहेर आपले पासपोर्ट जमा करून दिले की अमुक दिनार देऊन ८ दिवस टेंटमधे तर कधी रस्त्याच्या कडेला राहायला लागते. काहींना विसा मिळाला नाही तर मागे परत जावे लागते. का विसा दिला नाही वगैरे विचारून वेळ काढण्यात अर्थ नसतो.




इराण मधे सर्व चित्रे बदलतात. कचरा, धूळ, रस्त्याकडे लगतच्या फुटपाथवर गर्दी करून दिसणारे रेवडीवाले, फळवाले, पाण्याच्या बाटल्यावाले दिसेनासे होतात.

सुंदर, वळणदार हायवे सुरू होतात. लेफ्ट हँड ड्राईव्ह सुरू होते. वाटेत मरहूम आयातौल्ला खुमैनी मजार दिसते... शिया मजारांच्या उंच उंच महालवजा जागेत एसीत राहायला सोय होते. थंड पाणी सर्व ठिकाणी फुकट येत असते. गरीबांना मोफत राहायला व चमचमीत जेवण द्यायला लोक तत्पर असतात. कारण तुम्ही करबल्याला दर्शनासाठी जाता आहात म्हणून सरबराई. अगदी अपरात्री देखील प्रवाशांचा ओघ सुरू असतो.






इराणला संपूर्ण छेद देत प्रवास ८ दिवस चालू राहतो. वाटेत गच्च भरलेल्या मॉलमध्ये, टॉफ्या, केक, खजूर, सर्व इराणी माल विकला जातो.

बसरा यायच्या आधी पासपोर्ट गोळा करून इराकी सुरक्षा दलाकडे दिले जातात. तिथे २४ तासात काम होते. इराक मधे गचाळपणा, कपड्यावरून गरीबीचा अंदाज यायला लागतो. पण मेहमाननवाज़ीला ऊत येतो. रात्री गाड्या थांबवून आधी हात जोडून नंतर जास्त नाही नाही म्हटले तर हातातील पिस्तूलांचा हवेत गोळीबार करून 'चलो, चाय तो पी लो' म्हणून 'प्रेमाने' म्हटले जाते. उर्दू इथे कामाला येत नाही. ते काय बोलतात ते हातवारे करून सांगावे लागते. बसच्या ड्रायव्हरला रस्त्यावरच्या पाट्या वाचायला एका लोकल गाईडला न्यावे लागते.




करत करत नफ़ज शहर येते. तिथे सगळ्या वस्तू बस मधे ठेवून आता पायी चालत प्रवास सुरू होतो. ८६ किलोमीटर प्रवास शक्यतो रात्री सुरू करावा लागतो. लाल डब्यात डास मारायच्या औषधाऐवजी गुलाबपाण्याचा गार स्प्रे येणाऱ्यांची गरमी कमी करायची सेवा देतात. तोंडाने 'लब्बैक अल्लाहुमा लब्बैक' असे म्हणत म्हणत पाय भरभर पडतात. तेंव्हा रूंद रस्त्यावरून जाताना गर्दी होते. त्यातून आपापल्या बरोबरचे लोक पुढे मागे होतात तेंव्हा थांबून राहायला लागते. काहीतरी खाण्यासाठी आग्रह होत राहतो. मोफत पाणी काही ठिकाणी मिळते नाही तर लहान पोरांकडून बाटल्या विकत घ्यायला लागतात. तिथे पैसे कुठल्याही करन्सीत चालतात.



मग येते करबला. शियांसाठी मक्के नंतरचे पवित्र स्थल. तिथे तलवारीचे घाव पाठीवर काढताना अशूरा म्हणजे पैगंबर महंमदांच्या (स.) नातवाला क्रूरपणे मारल्याचा मातम मनवताना दिसतात.



१० टक्के सुन्नी पण झियारतला येतात. इतक्या मोठ्या मोठ्या मशीदी व मजार आहेत की नेमक्या हुसेन (रह.) ला मारले त्या मजारला दर्शन घ्यायला जातोय ते विसरायला होते. मजार आतून पाहताना डोळे दिपतात.



बसचा गाईड मजारतींची नावे घोकून घोकून पाठ करायला लावतो. मोफत राहायला जेवायला मशीदीत सोय. तिथले जेवण जात नाही कारण ते पंजाबी चमचमीत नसते.

नंतर बस मध्ये परतीचा प्रवास सुरु होतो. बगदाद, वगैरे पहायला मिळते. वाटेत अमेरिकन सैन्याने तुफान बॉम्बिंग करून बेचिराख केलेल्या इमारती, मोहल्ले जागोजागी दिसतात. करबला पुन्हा लागते. इथे पाकिस्तानी बसला लिटरला ५०० इराकी रुपये घेतात स्थानिकांना ४०० रुपयात. १ डॉलरला २ लिटर. ते ७६ पाकिस्तानी रुपयांना (२०२२च्या जानेवारीत १$ =180) पडते. ८६ किमीचा पायी चालत गेलेला तोच रस्ता आता उलटबाजूने बस मधून २ तासात पार होतो. ते मागे पडले की मग बसऱ्याच्या वाटेने विसावर ठप्पे मारत इराणला ८ दिवसांचा प्रवास करत क्वेटा आले की पश्तूनी भाषा आपली वाटते. मुल्तानमधे सराईकी भाषेतील संवाद कळतो पण बोलता येत नाही. करत करत महिनाभरानंतर पंजाबी बोलत लाहौरचे मोहल्लेवाले, ठेलेवाले, रस्त्यावर अस्ताव्यस्त वाहनांची गर्दी, कर्णकटू हॉर्न ऐकले की घरकी यादें ताजा हो जाती है! भाई अपना मुल्क तो अपनाही होता है... असे वाटून राहिले. आजकल दोस्त यारों को करबले की कहानियां सुनने के लिए दावतें आती है...!

क्यों कैसी रही, दर्ग्यात जाऊन प्रार्थना – झियारत?

